# आई

**‘हनुबाब’ उर्फ श्री. हनुमंत ह. रेडकर**
(havhanubab@gmail.com)

प्रकाशक:

eBook Publication Pvt. Ltd.
4/47, उदय को. हौ. सोसायटी,
आरे रोड, गोरेगाव पश्चिम,
मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२
Telephone: +91 7038164022
Email: publicationebook@gmail.com

प्रथमावृत्ती: **१२ मे २०१९**



मुखपृष्ठ:

शिव किरण उदय उज्वल हनुबाब
रेवोडा बार्देश गोवा
M: ९०२१५९५१२५

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.



*eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.

माझं हे पुस्तक माझी पवित्र आई
सौ. राधिका रेडकर यांना
तसंच या संसारातील तमाम आईंना
या मातृदिनी समर्पित करतो.

आई, तुझा आशीर्वाद माझ्या पाठीशी
सदाकाळ राहू दे.

# प्रस्तावना

**जयजयाजी मंगलमूर्ति । जयजय माय सरस्वती ।**
**आत्माराम सर्वांभूतीं । नमन करूं साष्टांगे ॥**
[श्रीसद्‌गुरुलीलामृत १३.१. १]

**नमो सद्‌गुरु परेशा । विराटरूपा विश्वेशा ।**
**मायबापा प्रकृतिपुरुषा । संतसज्जनां नमन असो ॥**
[श्रीसद्‌गुरुलीलामृत १३.१. २]

**आतां आईची थोरी मुक्तमुदी । लावीं माझिये वाग्वृद्धी ।**
**जे मानो हे जनसंसदी । मायाळूपणे ॥**

**आई** हा शब्दच पुरेसा आहे तिची थोरवी स्पष्ट करण्यासाठी! कारण हा शब्दच **इहलोक** व **परलोक** यांना जोडणारा दुवा आहे. परमात्म्याचा अंश ज्याठिकाणी जीवात्मरूपाने प्रवेश करतो, ते स्थान म्हणजे **आई**; म्हणूनच **आ**त्मा व **ई**श्वर यांच्या साहचर्याने साध्य होणारा योग म्हणजे **आई** !!

ज्ञानेश्वर माऊली म्हणतात -

**आणि बाप तूं माय । इहीं बोलीं ना स्तुति होय ।**
**डिंभोपाधिक आहे । विटाळु तेथें ॥**
[ज्ञाने.१८. २१]

त्यामुळे **आई**ची स्तुती आम्ही काय करणार? कारण सद्गुरूलीलामृतात म्हणतात –

**आमुचें हित आम्हांसी । ठाऊक नसे निश्चयेंसी ।**
**परि माय जाणें मानसीं । वेळोवेळां सांवरीतसे ॥ ५ ॥**

आणि हीच अगदी अशीच भावना कविमित्र हनुबाब आपल्या "**आई**" या काव्यांजलीतून मांडताना म्हणतात -

**मुलाला दुखलं तर लगेच आईला जाणीव व्हायची**
**थोडी पण इजा झाली तर आई खचायची**
**मूल ठीक होईपर्यंत ती चिंतीत असायची**
**ते बरं झालं की मगच ती स्वस्थ बसायची**

**आई** कशी असते तर ती –

**घर कुटुंबियांवर आपलं सर्वस्व वाहते**
**आपल्या आई-बाबांसाठी ती ना उरते**

खरं आहे अगदी **आई** एकदा या घरी आली की ती इकडचीच होते नि

**आपले घर कुटुंब आणि घरकुल हाच तिचा साठा**
**आपल्या घरकुलाला ती अगदी सोन्याप्रमाणे जपते**
**मुलं-बाळं, नवरा, सुना, सासू-सासरे सगळ्यांनाच ती सांभाळते**

अशी ही आई

**रात्री उशिरा झोपते नि भल्या पहाटे उठते**
**उष्टी भांडी आवरते मगच ती जाऊन झोपते**
**सकाळी लवकर उठून परत ती झिजते**
**हे सगळं काही निस्वार्थपणे ती करते**

पण या निस्वार्थी **आई**च्या नशिबी काय येते

**आई आपल्या मुलांना कधीच विसरत नाही**
**तिच्यासाठी मुलं कधीच मोठी होत नाही**
**पण मुलांसाठी असं कधीच असत नाही**
**मुलं मोठी झाल्यावर, म्हाताऱ्या आईला सोडून ती जाई**

अशी सत्यतेची जाणीव करून देत कवी हनुबाब मुलांचे डोळे उघडण्यासाठी जळजळीत अंजन घालत म्हणतात

**आई असली की बरं वाटतं**
**आई नसली की पोरकं वाटतं**
**आई असावी सदाच आपल्या सोबत**
**आईविना जगण्याची कधीच न येवो नौबत**

म्हणून कविमन सांगतं

**'आई' आपली सुरुवात, आणि शेवटही आपलीच 'आई'**

कारण

**आई म्हणजे सर्व काही**
**आईविना दुसरं काहीच नाही**
**आईच आपलं सर्वस्व**
**आईच आपलं वर्चस्व**

अशी ही आईची महती हनुबाब यांनी अत्यंत साध्या भाषेत पण मार्मिकपणे मांडली आहे. या **आई** म्हणून आत्मरूपाने होणाऱ्या ईश्वराच्या प्रवासाचे वर्णन म्हणजे एक या जगीचे रामायणानंतर होणारे "**मात्रायण**" नव्हे काय !!!

\- **डॉ. नीलेश जोशी वैशंपायन**
मुंबई १२ मे २०१९

# || माझी आई ||

**आईवर लिहावयास आहे बरंच काही**
**लिहावयास गेल्यास शब्दच पुरत नाही**
**लिहिता लिहिता माझं काव्य संपतच नाही**
**एक एक आठवणीने भरलेली ही माझी आई**

**आई** म्हटलं कि सगळं काही, आपल्या जीवनातील प्रेम, माया, ममता, कष्ट, सहनशीलता, आत्मीयता, जबाबदारी, संरक्षण आणि बरंच काही. म्हणजे **'आई'** हा विषय खूप भारावून टाकणारा असतो. तो विषय आपल्या हृदयात वसलेला असतो. जन्मापासून तिची ती साथ, तिचा तो सहवास आपल्याबरोबरच असतो. तीच आपली पहिली शिक्षिका, आणि तीच आपल्याला शिक्षा करणारी. एका **आई**त आपलं सर्वस्व सामावलेलं असतं. आपल्याला **आई** असायला खरोखरंच भाग्य असायला लागतं. आज मला **आई** आहे

आणि म्हणूनच मी स्वतःला खूपच भाग्यशाली मानतो. **आई** तुझे मायोपकर मी कधीच विसरू शकत नाही.

आज मातृदिवस असल्याकारणाने मला वाटलं की मी माझं काव्य **आई**वर लिहून प्रकाशित करावं, तसंच **आई**वरचं प्रेम दाखवायची संधीचा फायदा काव्यरूपाने दाखवावा या निव्वळ हेतूने मी या पुस्तकाला हात घातला.

खरं म्हणजे मी माझ्या 'ती' या काव्यपुस्तकासाठी '**आई**'वर लिहायला सुरुवात केली होती. लिहिता लिहिता एक कडवं लिहिलं, दुसरं लिहिलं, मग तिसरं, मग चौथं, आणि मग लिहिता लिहिता अशी अनेक कडवी माझ्या हातून सहजच घडली आणि ही भलीमोठी कवितांची **आईमाळ** तयार झाली. मग ठरवलं **आई** नुसती 'ती' असू शकत नाही, ती 'ती'च्याहून बरंच काही आहे. आणि म्हणून मी तिला 'ती' पासून वेगळं केलं आणि तुमच्या समोर '**आई**'च्या स्वरूपात मांडलं.

या कवितेत मी **आई**बद्दल खूप काही लिहिलं आणि बरंच काही राहून गेलं. पण जे काही लिहिलं ते तुम्हा सर्व **आईपुत्रांना** जरूर आवडेल. तुम्ही ह्या '**आई**'ची मुलं समजून आपल्या **आई**ला ह्या काव्यातून जरूर समजून घ्या आणि **आई**ला प्रेम आदर सम्मान द्या.

हे माझं अतिविशेष पुस्तक '**आई**' लिहिताना माझी प्रेरणा ठरलेल्या माझ्या **आईचे**, तसेच माझ्या मित्रमंडळींच्या **आईंचे** अगदी मनापासून आभार मानतो कारण ह्या सगळ्या **आई-कहाण्यांमुळेच** मी हे लिहू शकलो. तसेच माझ्या या पुस्तकाचं प्रूफरिडींग करणारे माझे मित्रबंधू श्री. नीलेश जोशी यांचे मी खूप आभार मानतो कारण त्यांनी या कवितेला आपल्या मनातील भाव प्रकट करून अक्षरजुळवण केली आणि एक परम सुंदर प्रस्तावना दिली. तसेच या '**आई**'चे मुखपृष्ठ घडवून आणणाऱ्या '**आई**'च्या मुलांचा पण मी आभारी आहे. ‘eBook Publication Pvt. Ltd.' या प्रकाशन संस्थेचे मी खूप आभार मानतो कारण त्यांच्या याच मदतीमुळे आज हे माझं **आईप्रेम** तुमच्या पर्यंत पोहोचले आहे.

या पवित्र मातृदिवशी मी हे माझं **आई**वरचं प्रेम, माझं **आई**वरचं काव्य **'आई'** माझी **आई**, **सौ. राधिका हरिचंद्र रेडकर** तसेस या जगातील तमाम मातांना अर्पण करतो.

आशा आहे की हे पुस्तक तुम्हाला जरूर आवडेल. तुमच्या प्रतिक्रिया जरूर कळवा, **आईवर** प्रेम करताच राहा आणि एकच लक्षात ठेवा –

**'आई' आपली सुरुवात, आणि शेवटही आपलीच 'आई'**

**हनुबाब**

**गोवा**

**९०४९०८३०२५**

# आई

ती माझी आई, मायेमोगाची माई
प्रेम माया संरक्षण करणारी माझी आई
जशी जीवन सृष्टी जागविणारी धराताई
तशीच माझं जीवन घडविणारी माझी आई

आई आहे माझी अगदी श्रेष्ठ
नाही कुणीही तिच्याहून ज्येष्ठ
बाबा असले जरी मानाने मोठे
आईपेक्षा कुणीच नसते मनाने मोठे

काय बरं तिच्याकडून शिकावं
कसं उठावं कसं बसावं कसं खावं
कसं जगावं कसं वागावं कसं सावरावं
अशा अनेक गोष्टी नि बरंच काही शिकावं

कालपर्यंतची ती एक लहानशी चिमुकली
बघता बघता ती मुलगी एवढी मोठी झाली
लग्न झालं सौभाग्य मिळालं बाई ती झाली
मुल जन्माला आणलं आणि ती आई बनली

नऊ महिने ती सांभाळते मुलाला आपल्यात
सगळ्या वेदना सहन करते ती आनंदात
मुलाला जन्माला आणणारच, असतो तिला विश्वास
मूल जन्माला येताच सुरु होतो आई बनण्याचा प्रवास

मुलं कसली पण असली
गोरी काळी मोठी नाठी
कशी पण ती दिसायला असली
आईच स्वीकारते, म्हणते त्यांना आपली

आई मुलांना हसवते काय खेळवते काय
स्वतःचं दुःख विसरून मुलांना खूष ती ठेवते काय
मुलांसाठी ती किती कष्ट किती वेदना घेते काय
दिवस रात्र, सकाळ सांज, मुलांसाठी झिजते काय

मुलांच्या मुखावर एक स्मित आले की
मुलांनी थोडंतरी प्रेम दाखवले की
मुलांनी आईवर इवलीपण माया केली की
बघा कशी प्रेमळ आनंदी आणि मनखुषी बनते ती

मुलाला दुखलं तर लगेच आईला जाणीव व्हायची
थोडी पण इजा झाली तर आई खचायची
मूल ठीक होईपर्यंत ती चिंतीत असायची
ते बरं झालं की मगच ती स्वस्थ बसायची

मुलं सुखी आनंदी असावी हेच असतं तिच्या मनात
संसार समाधानी आणि समृद्ध असावा हे वाटतं तिला सतत
मुलं मोठी व्हावी, घडावी हेच बघायचं असतं तिला डोळ्यात
कुटुंब कल्याण आणि घर घडवणं हेच असतं तिच्या ध्यानात

मुलांसाठी ती दररोज राब राब राबते
मुलं घरी आली नाही की वाट बघत ती बसते
आपलं पोट मारून मुलांना ती भरवते
मुलं सुरक्षित झोपली तरच ती झोपते

आपल्या मुलांवर ती खूप प्रेम करते
नवऱ्यावरपण ती तेवढाच जीव लावते
घर कुटुंबियांवर आपलं सर्वस्व वाहते
आपल्या आई-बाबांसाठी ती ना उरते

आई जेव्हा जेव्हा जवळ असते
भीती आपल्याला कसलीच नसते
थंडी ताप खोकला सर्दी हे जरी येते
जवळ आई असता दूर ते उडून जाते

आईला आपल्यापेक्षा आपली मुले नि संसार मोठा
आपले घर कुटुंब आणि घरकुल हाच तिचा साठा
आपल्या घरकुलाला ती अगदी सोन्याप्रमाणे जपते
मुलं-बाळं, नवरा, सुना, सासू-सासरे सगळ्यांनाच ती सांभाळते

नवऱ्याकडून शिव्या गाळी मार ती खाते
मुलांकडून उगाच ओरडून बोलून ती घेते
सासू-सासरे, घरच्यांकडून बरंच काही सहते
असच आपलं जीवन मुकाट्याने ती जगते

कधी कधी ती एकटीच बसून रडते
मनातील दुःख मुलांपर्यंत कधीच नाही पोहोचवते
कितीही कष्ट असले तरी नाही कधीच ती दाखवते
सगळं काही मनातल्या मनात सहन करते

रात्री उशिरा झोपते नि भल्या पहाटे उठते
उष्टी भांडी आवरते मगच ती जाऊन झोपते
सकाळी लवकर उठून परत ती झिजते
हे सगळं काही निस्वार्थपणे ती करते

आई आपल्याला खूप काही शिकवते
आपलं आयुष्य आपलं जीवन घडवते
आपल्या मुलांचा कुतूहल पण तीच करते
मुलं चुकली तर कानाखाली पण तीच वाजवते

आपल्यात भले चांगले संस्कार जे असतात
आईकडूनच आपल्यापर्यंत ते पोहोचतात
आई आपल्याला जे चांगले संस्कार देते
त्यातूनच आपल्यातला चांगला माणूस ती घडवते

आईच्या मनात असतात अनेक विचार
मुलं शिकावी मोठी व्हावी नसावी बेकार
सुसंस्कृत आणि कर्तृत्ववान बनावी हुशार
आपल्या कुटुंबाबद्धल असतो आईचा हाच व्यवहार

मुलगा असो वा असो ती मुलगी
घराबाहेर जाण्यास जेव्हा ती निघाली
आईच उठून बनवते त्यांच्यासाठी नाश्टापाणी
कधीच जाऊ देत नाही घरातून त्यांना उपाशी

आपलं मूल जेव्हा दूरगावी जाते
आईच त्याच्यासाठी शिदोरी बनवते
त्याला जे आवडते तेच ती शिजवते
डब्बा गच्च भरून प्रेमाने ती देते

मुलगी शिकली प्रगती झाली आईला आणि मदत मिळाली
आईकडून सगळं शिकली आपल्या नव्या घरात चांगली वागली
काही येत नाही तेव्हा सासूला विसरून आईचीच मदत घेतली
आईची माया आईची ममता आईचीच छाया मुलीत अवतरली

मुलगी सासरी जाते संसारात तिच्या मस्त रमते
सुखी-आनंदी आयुष्य जगते, माहेर पण विसरते
सुखदुःखाच्या प्रत्येक क्षणात आईला ती आठविते
दूर जरी राहिली तरी आईचं नातं थोडी ती विसरते

मुलगा शिकला, मोठा झाला, बनला एकदम भारी
नोकरी मिळाली, लग्न झालं, बायको आली घरी
लग्नात गुंतला, नोकरीत रमला, बनला तो संसारी
घर सोडलं, बंगला बांधला, आता आईला कोणी विचारी

मुलगा जेव्हा खूप दिवसांनी घरी परत आला
आईच्या डोळ्यातून नकळत अश्रूचा थेंब तो आला
तो थेंब बघुनी काय म्हणून वाटलं असेल त्या मुलाला
आई माझी किती म्हणून आठवीत असे हो मला

आई आपल्या मुलांना कधीच विसरत नाही
तिच्यासाठी मुलं कधीच मोठी होत नाही
पण मुलांसाठी असं कधीच असत नाही
मुलं मोठी झाल्यावर, म्हाताऱ्या आईला सोडून ती जाई

सगळ्या कुटुंबाला सांभाळते एक बाई
ती घरात नाही तर घराला घरपण नाही
मुलं-बाळं ढोरं-वनं सगळंच ती सांभाळी
असं अष्टपैलू व्यक्तिमत्व आईशिवाय कोणी नाही

आईला नसतो कुठलाच धर्म
अर्थात नसतो 'आई'च्या वेगळा मर्म
हिंदू असो वा मुस्लिम, वा असो इसाई
सगळ्यांसाठी असते आई ती आई

आई असली की बरं वाटतं
आई नसली की पोरकं वाटतं
आई असावी सदाच आपल्या सोबत
आईविना जगण्याची कधीच न येवो नौबत

आई जेव्हा असते बाळ आम्हाला म्हणते
आई जेव्हा जाते बाळ म्हणायला कुणी नसते
आईसाठी आपण कधीच वाढलेले नसतो
आई गेल्यावर आपण नकळत जबाबदार बनतो

जराशी पण इजा झाली, उच्चार येतो तो 'आई'
घात अपघात झाला तेव्हा ओरडतो आपण 'आई'
लागलं जरी आपल्याला झटकन म्हणतो चटकन 'आई'
'आई' आपली सुरुवात, आणि शेवटही आपलीच 'आई'

आई किती म्हणून करशील तू उपासना
आता मी मोठा झालो आता शांत बस ना
जे काही तुला हवे ते मी आणून देऊ शकतो ना
मग का म्हणून घेतेस ही दिवसभराची वेदना

पण सगळेच असे नशीबवान नसतात
नसते आईची माया, तिचं प्रेम, तिचा तो सहवास
फक्त असतात त्या आठवणी, कधी त्या पण नसतात
कुणी आईला पाहिलंच नसतं तर कुणी अनुभवलं पण नसतं

म्हणून माझा हा कानमंत्र ऐका
आई एकच असते तिला तुम्ही जपा
तिला थोडा प्रेम द्या तुमचा सहवास द्या
तिच्यावर अफाट अखंड अनंत प्रेम करा

तिला आधाराचा हात द्या, तुमची साथ द्या
नका तिला एकटीला सोडू, तिचा मान मोडू
कधीच तिला नका देऊ त्रास देवास मागू एकच दान
मिळो तिला मान न होवो तिचा कधीच अवमान

आई म्हणजे सर्व काही
आईविना दुसरं काहीच नाही
आईच आपलं सर्वस्व
आईच आपलं वर्चस्व

अशी आहे माझी आई
थोडी भोळी थोडी भाबडी
कशी पण ती दिसत असली
असणार फक्त ती माझीच आई

तुझ्यावर प्रेम करतो कधीच सांगितलं नाही
हो करतो मी प्रेम तुझ्यावर समजलं की नाही
तू दिलेली सगळी विद्या सगळं सगळं काही
नाही विसरू शकणार हो माझ्या आई

**आतां आईची थोरी मुक्तमुदी । लावीं माझिये वाग्वृद्धी ।**
**जे मानो हे जनसंसदी । मायाळूपणे ॥**

**आई** हा शब्दच पुरेसा आहे तिची थोरवी स्पष्ट करण्यासाठी! कारण हा शब्दच **इहलोक** व **परलोक** यांना जोडणारा दुवा आहे. परमात्म्याचा अंश ज्याठिकाणी जीवात्मरूपाने प्रवेश करतो, ते स्थान म्हणजे **आई**; म्हणूनच **आ**त्मा व **ई**श्वर यांच्या साहचर्याने साध्य होणारा योग म्हणजे **आई** !!

**आई म्हणजे सर्व काही**
**आईविना दुसरं काहीच नाही**
**आईच आपलं सर्वस्व**
**आईच आपलं वर्चस्व**

अशी ही आईची महती हनुबाब यांनी अत्यंत साध्या भाषेत पण मार्मिकपणे मांडली आहे. या **आई** म्हणून आत्मरूपाने होणाऱ्या ईश्वराच्या प्रवासाचे वर्णन म्हणजे एक या जगीचे रामायणानंतर होणारे "**मात्रायण**" नव्हे काय !!!

- **डॉ. नीलेश जोशी वैशंपायन**



eBook Publication Pvt. Ltd.®